राज्यातील प्रमुख पिकांवरील कीड व रोगांच्या व्यवस्थापनाच्या दृष्टीने कीड-रोग सर्वेक्षण व सल्ला योजनेच्या (क्रॉपसॅप) अमांलबजावणीस प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः किरोनी - २०२०/प्र.क्र.१७३/११-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २७ मे, २०२०.

**वाचा :-**

१. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.किरोनि/१४१८/प्र.क्र.५५/४-अे, दि.१९/०५/२०१८
२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.किरोनि/१४१८/प्र.क्र.५५/४-अे, दि.२६/०२/२०१९
३. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. राकृवि-२०१८/प्र.क्र.१६९/भाग-१/१४-अे, दि.०२/०३/२०१९
४. वित्त विभाग शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/ प्र.क्र.६५/ अर्थ-३, दि. ४/०५/२०२०
५. आयुक्त (कृषी) यांचे पत्र जा. क्र./विप्र-७/क्रॉपसॅप २०-२१/प्रमासू-१/२०२०/ १२८३६, दि.१४/०५/२०२०.

**प्रस्तावना:**

सन २०१८-१९ मध्ये क्रॉपसॅप व हॉर्टसॅप प्रकल्पाची एकसमान कार्यपध्दती विचारात घेऊन दोन स्वतंत्र प्रकल्प न राबवता हॉर्टसॅप प्रकल्पाचा समावेश क्रॉपसॅप योजनेमध्ये करुन एकाच लेखाशिर्षांतर्गत संदर्भिय शासन निर्णय दिनांक १९/०५/२०१८ नुसार एकत्रित अमंलबजावणी करण्यात आली आहे. खरीप २०१८ मध्ये मका, उस व ज्वारी या पिकांवर नव्यानेच लष्करी अळीचा (Fall Army Worm) तसेच उस पिकावर हुमणी किडीचा प्रादुर्भाव वाढत असल्याने संदर्भ क्र. २ येथील दि.२६/०२/२०१९ च्या शासन निर्णयान्वये मका व ऊस या पिकांचाही क्रॉपसॅप प्रकल्पामध्ये समावेश करण्यात आला आहे. आयुक्त कार्यालयाने संदर्भ क्रं. ४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून प्रस्तुत योजना सन २०२०-२१ मध्ये राज्यात राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

१. सन २०२०-२१ पासून सोयाबीन, कापूस, भात, तूर, हरभरा, मका, ज्वारी व ऊस तसेच फळपिके आंबा, डाळींब, केळी, मोसंबी, संत्रा व चिक्कू या प्रमुख पिकांवरील कीड व रोगाच्या व्यवस्थापनाच्या दृष्टीने एकत्रितकीड-रोग सवक्षेण व सल्ला योजना (क्रॉपसॅप) योजना राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे. सन २०२०-२१ मध्ये या योजनेतंर्गत रु. १६.५० कोटी (अक्षरी रुपये सोळा कोटी पन्नास लक्ष फक्त) निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१८-१९ करीता शासनाने संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सुचनांनुसार कीड-रोग सर्वेक्षण व सल्ला योजनेची सन २०२०-२१ मध्ये अंमलबजावणी करण्याकरिता आयुक्त (कृषि) यांनी मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात.

३. कीड व रोग सर्वेक्षणाची माहिती मोबाईलद्वारे ऑनलाईन संकेतस्थळावर भरण्यास येणाऱ्या अडचणी सोडविण्यासाठी आवश्यकतेनुसार महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ यांच्यामार्फत संगणक ऑपरेटर व इतर अत्यावश्यक मनुष्यबळ, आयुक्त (कृषि) यानी उपलब्ध करुन घ्यावे. तसेच त्यांच्या मदतीने कृषि खात्यातील कर्मचाऱ्यांना माहिती भरण्याचे प्रशिक्षण देण्यात यावे.

४. केंद्र शासन पुरस्कृत राष्ट्रीय अन्नसुरक्षा अभियान (NFSM), राष्ट्रीय कृषि विकास योजना (RKVY) आणि नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प (POCRA) या योजनांच्या समन्वयातून एकात्मिक स्वरुपात (Convergence) अंमलबजावणीचा आराखडा तयार करुन शेतीशाळांचे नियोजन करण्यात यावे. सदर शेतीशाळा अंतर्गत प्रशिक्षण, प्रात्यक्षिके, एकात्मिक कीडरोग व्यवस्थापन व एकात्मिक अन्नद्रव्य व्यवस्थापन, प्रचार व प्रसिध्दी इत्यादीकरींता आयुक्त (कृषि) यांनी सादर केलेल्या प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर प्रयोजनार्थ प्राधान्याने विविध केंद्र पुरस्कृत योजना राष्ट्रीय अन्नसुरक्षा अभियान (NFSM), राष्ट्रीय कृषि विकास योजना (RKVY) आणि नानाजी देशमुख कृषि संजीवनी (POCRA) प्रकल्पांतर्गत उपलब्ध निधीतून पात्र बाबींसाठी खर्च करण्यास व तदनंतर निधी कमी पडल्यास आवश्यकतेनुसार सदरच्या राज्य योजनांतर्गत उपलब्ध होणाऱ्या रु.१६.५० कोटीच्या तरतूदीतून खर्च भागविण्यात यावा.

६. सोयाबीन, कापूस, भात, तूर, हरभरा मका, ज्वारी व ऊस या पिकांसाठी क्रॉपसॅप योजनेची अंमलबजावणी कृषि विभागाच्या क्षेत्रीय कर्मचाऱ्यांच्या सहभागाने करण्यात यावी व याकरीता राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, पुणे यांनी विकसीत केलेल्या मोबाईल ॲप्लिकेशन व संगणक प्रणालीचा वापर करण्यात यावा.

७. क्रॉपसॅप योजनेतंर्गत पिकांवरील प्रमुख कीड व रोगांचे सर्वेक्षण करुन त्याच्या व्यवस्थापनाबाबत संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार महाॲग्रीटेक प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणाऱ्या वनस्पती निर्देशांक (Vegitation Condition) व स्वंयचलित हवामान केंद्रांव्दारे (AWS) प्राप्त होणाऱ्या माहितीच्या आधारे विद्यापीठातील तज्ज्ञांकडून विश्लेषण करुन देण्यात येणारा सल्ला व मार्गदर्शन मोबाईल ॲपद्वारे / एसएमएसद्वारे शेतकऱ्यांना उपलब्ध करुन देण्यात यावेत.

८. संबंधित पिकाच्या विकासाच्या विविध महत्वपूर्ण (Critical) टप्प्यावर कीड व रोगाचे प्रमाण आर्थिक नुकसान पातळीवर पोहोचण्यापूर्वी अथवा आर्थिक नुकसान पातळीजवळ (पिवळ्या टप्प्यावर असताना) सुरुवातीपासूनच संबंधित नेमून दिलेल्या गावातील पिकांचे नमुने घेऊन त्याची तपासणी व सर्वेक्षण काटेकोरपणे नियमित स्वरुपात प्रणालीद्वारे तज्ञांकडून मार्गदर्शन व सल्ला प्राप्त करुन त्यासंदर्भात तात्काळ संबंधित पीक क्षेत्राच्या गाव व तालुका स्तरावर शेतकऱ्यांना आवश्यक सल्ला मोबाईल

एसएमएसद्वारे देण्याची व सविस्तर मार्गदर्शन करण्यासाठी स्वतंत्र सभा, बैठका व प्रात्यक्षिकांचे आयोजन करण्याची जबाबदारी ही कृषि सहाय्यक व कृषि पर्यवेक्षक यांची राहील. यानुसार गावपातळीवर कार्यवाही नियमितिणे होत असल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी ही मंडळ कृषि अधिकारी आणि तालुका कृषि अधिकारी यांची असेल. याबाबतचा उपविभागीय स्तरावर नियमितिणे प्रत्येक पंधरवडयास उपविभागीय कृषि अधिकारी यांनी आढावा घेणे बंधनकारक असेल.

९. वरीलप्रमाणे केलेल्या कार्यवाहीबाबतचा आढावा हा जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी व विभागीय कृषि सहसंचालक यांनी घ्यावा. तसेच क्षेत्रीय स्तरावरुन कृषि विद्यापिठांकडे पिकावरील कीड व रोगासंदर्भात मार्गदर्शन व सल्ला घेण्यासाठी प्राप्त होणाऱ्या बाबींची विनाविलंब नोंद घेऊन त्यावर नियमित स्वरुपात दोन दिवसांच्या आत संबंधित तज्ञांचे मार्गदर्शन व सल्ले प्रणालीद्वारे उपलब्ध करुन देण्यात यावे. याबाबत देखील विद्यापीठ स्तरावर विविध विभागाच्या विभाग प्रमुखांनी आढावा घेणे आवश्यक असेल.

१०. तसेच कीड रोगाचे प्रमाण आर्थिक नुकसानपातळीवर (ईटीएल) पोहोचण्यापुर्वी अथवा आर्थिक नुकसानपातळी जवळ (पिवळ्या टप्प्यावर असताना) असलेल्या आणि आर्थिक नुकसानपातळीवर पोहोचलेल्या गावांची तालुकानिहाय स्वतंत्र अद्ययावत यादी सर्व संबंधितांच्या माहितीकरिता खुल्या स्वरुपात प्रकल्पाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देणे बंधनकारक असेल.

११. विविध पीकांवरील कीड रोगाच्या प्रादुर्भावामुळे आर्थिक नुकसान पातळीच्यावरील गावात अन्नसुरक्षा अभियान कार्यक्रमांतर्गत एकात्मिक कीड रोग व्यवस्थापनाकरीता उपलब्ध असलेली तरतूद योजनेच्या मार्गदर्शक सुचनांनुसार शेतकऱ्यांना रसायनिक कीटकनाशक या आपत्कालीन निविष्ठांसाठी अनुदान उपलब्ध करुन देण्यात यावे.

१२. कृषि आयुक्तालयाच्या स्तरावर फळ पिकांच्या सर्वेक्षण व सल्ल्याबाबत संचालक (फलोत्पादन) पर्यवेक्षण व सनियंत्रण करतील. इतर पिकांच्या सर्वेक्षण व सल्ल्याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) हे पर्यवक्षेण व सनियंत्रण करतील. संबधित संचालक यांनी त्यांच्या नियंत्रणाखालील प्रचलित योजनांची सांगड घालून कीड रोग नियंत्रणात ठेवण्याच्या दृष्टीने नियमित पाठपुरावा करावा व सनियंत्रण करावे. तसेच संपुर्ण हंगाम कालावधीत दोन्ही संचालकांनी संबंधित पिकांबाबत क्षेत्रीय स्तरावरील कीड व रोग प्रादुर्भावाच्या परिस्थितीचा प्रत्येक आठवडयास आढावा घेऊन आवश्यक उपाययोजना करण्याची कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीचा सविस्तर अहवाल शासनास सादर करावा.

१३. शासनाच्या विविध योजनेच्या अंमलबजावणीकरीता निर्माण केलेल्या निरनिराळ्या मोबाईल ॲपव्दारे कीड व रोगांची निरीक्षणे, पीक कापणी प्रयोग, मोका तपासणी इ. करीता स्वत:च्या मोबाईलवरुन ऑनलाईन माहिती भरण्यासाठी तसेच, कीड - रोग व्यवस्थापनाबाबत आणि अन्य बाबींसंदर्भात शेतकऱ्यांना मार्गदर्शन करण्यासाठी मोबाईल इंटरनेट व अन्य आकस्मिक बाबींवर

होणाऱ्या खर्चाच्या प्रतीपूर्तीसाठी ज्या कृषि सहायक व कृषि पर्यवेक्षकांना कामे निश्चित करुन देण्यात येते, त्यांना प्रोत्साहनपर रु.२००/- प्रती महिना संपुर्ण आर्थिक वर्षासाठी मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रयोजनार्थ येणारा खर्च हा संबंधित केंद्र शासन पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी असणाऱ्या प्रशासकीय खर्चाच्या तरतूदीतून करण्यात यावा.

१४. प्रकल्पांतर्गत आवश्यक आपत्कालीन निविष्ठांची उपलब्धता दिनांक १ जुलै पासून होणे आवश्यक असल्याने यथाशिघ्र फेरोमेन सापळे व ट्रायकोग्रामा इत्यादी या निविष्ठांच्या वेळेत उत्पादन व पुरवठ्याबाबत महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, कृषि विद्यापिठे, कृषि विज्ञान केंद्र, कृषि विभागाच्या जैविक किटकनाशके उत्पादन प्रयोगशाळा यांना आयुक्त (कृषि) यांचे स्तरावरुन कळविण्यात यावे.

१५. सदर योजना शेतकऱ्यांना कमी खर्चात जास्तीत जास्त पीक उत्पादन वाढवून त्यांचे उत्पन्न वाढविण्याच्या दृष्टीकोनातून अत्यंत महत्वपुर्ण असल्याने विशेष मोहीम स्वरुपात अंमलबजावणी होईल याची खातरजमा आयुक्त (कृषी) यांनी करावी. याकरीता आवश्यकतेनुरुप योजनेचा प्रचार व प्रसिध्दी देण्याची देखील कार्यवाही करावी.

१६. सन २०२०-२१ मध्ये क्रॉपसॅप योजनेची अमंलबजावणी खर्च पुढील लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ करीता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा:-

**मागणी क्र. डी-३**
**२४०१,पीक संवर्धन,**
**१०२-अन्नधान्यपीके, (००) (३०) पिकावरील कीड-रोग सवक्षेण व सल्ला प्रकल्प**
**(२४०१ ९२४२) राज्य योजना, ३३-अर्थसहाय्य**

१७. सदर योजनेतंर्गत मंजूर निधी आयुक्तालय स्तरावर कोषागारातून आहरीत करुन योजनेतंर्गत सहभागी संस्थांना वितरीत करण्यास, तसेच, आयुक्तालय स्तरावरील खर्चासाठी सहाय्यक संचालक, लेखा-१, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणनू आणि आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. **तसेच, विभागीय कृषि सहसंचालक स्तरावर विभागीय कृषि सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी, जिल्हा स्तरावर जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, उपविभाग स्तरावर उपविभागीय कृषि अधिकारी व तालुका स्तरावर तालुका कृषि अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत** करण्यात येत आहे. याचप्रमाणे, आयुक्त (कृषि) यांनी सदर योजनेतंर्गत प्राप्त होणाऱ्या निधीचे आवश्यकतेनुसार जिल्हानिहाय वितरण करावे.

१८. सदर योजनेतंर्गत वेळोवळी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उयोपगिता प्रमाणपत्र आयुक्त (कृषि) यांनी शासनास सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून याचा संकेताक २०२००५२७१३१५२९८७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, serialNumber=fc102de27dc1b41e747ac6cbb491c4209459c3cf340720ea98fd1d95b19c9f65, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2020.05.27 14:38:21 +05'30'

**( सु. सं. धपाटे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री(कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता, विधानिपरषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
११. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल,शिवाजीनगर,पुणे.
१२. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, साखर संकुल,शिवाजीनगर,पुणे.
१३. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१४. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
१५. महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखापरिक्षा व लेखा), मुंबई.
१६. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१९. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय,पुणे
२०. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
२१. निवड नस्ती ४-अे.